**पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २६१०/प्र.क्र.१५४/पंरा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक : २८ सप्टेंबर , २०१०**

**वाचा :-** शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २६१०/प्र.क्र.१ /पंरा-४ दिनांक : १८ ऑगस्ट , २०१०

**प्रस्तावना :-**

शासनाने पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेसंदर्भात दिनांक १८ ऑगस्ट,२०१० रोजी शासन निर्णयाद्वारे योजनेची उद्दिष्टे, निकष व योजनांतर्गत मिळणारा निधी व घ्यावयाची कामे इ बाबत सविस्तरपणे दिलेली आहेत. यानुसार राज्यात ग्राम पंचायतीमार्फत वृक्ष लागवड, कर वसुली, हगणदारी मुक्त गांव या बाबत कार्यवाही सुरु आहे. पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेत ग्रामपंचायतीच्या निवडीसाठी पंचायत समिती, जिल्हा परिषद, राज्यस्तरावर तपासणी व संनियंत्रण समित्याची स्थापना करण्यात आलेली आहे. या सर्व पातळीवर तपासणी वेळेत होऊन ग्रामपंचायतीची निवड करण्यासाठी निश्चित कालावधी ठरविणे व तपासणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना देण्याची गरज आहे. यासाठी या शासन निर्णयाद्वारे खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेत निकष पूर्ण केलेल्या ग्रामपंचायतीनी दिनांक २ ऑक्टोंबर, २०१० या महात्मा गांधी जयंतीच्या दिनानिमित्त होणाऱ्या ग्रामसभेत या योजनेत भाग घेण्यासाठी व इतर निकष पूर्ण करण्याची हमी देण्याबाबत ठराव करणे व त्यानंतर या योजनेत भाग घेण्यासाठी पंचायत समितीकडे दि. १५/१०/२०१० पर्यंत शासनाने दिलेल्या विहित प्रपत्रात अर्ज गट विकास अधिकारी यांच्याकडे विहित प्रपत्रात अर्ज करणे आवश्यक आहे. ग्रामपंचायतींनी पंचायत समितींकडे पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजने संदर्भात करावयाच्या अर्जाचे प्रपत्र सोबत जोडले आहे. पंचायत समितीने अर्ज केलेल्या गांवांची तपासणी करून जिल्हा परिषदेकडे निकष पूर्ण करणाऱ्या ग्रामपंचायतींचे प्रस्ताव पाठवायचे आहेत. त्यानंतर जिल्हा परिषदेने जिल्हयातील निकष पूर्ण करणाऱ्या ग्रामपंचायतींचे प्रस्ताव शासनाकडे पाठविणेचे आहे. यासाठी खालील नमूद वेळापत्रकाप्रमाणे कार्यवाही करण्याचे आहे.

## ग्राम पंचायत निवडीचे वेळापत्रक

| अ.क्र. | तपशील | दिनांक |
|---|---|---|
| १ | ग्रामपंचायतींचा या योजनेत सहभागी होणेसाठीचा ग्रामसभेचा ठराव | दि. २ ऑक्टोंबर २०१० |
| २ | ग्रामपंचायतींनी योजनेचा अर्ज भरून पंचायत समितीकडे सादर करावयाचा कालावधी | दि. २ ऑक्टोंबर ते दि.१५ ऑक्टोंबर, २०१० |
| ३ | पंचायत समिती पातळीवर योजनेच्या निकषानुसार तपासणी | दि. १६ ऑक्टोंबर ते दि. ५ नोव्हेंबर २०१० |
| ४ | जिल्हा स्तरीय समितीने ग्रामपंचायतीचे रॅन्डम तपासणी करणे | दि. ६ नोव्हेंबर ते दि. २५ नोव्हेंबर २०१० |
| ५ | जिल्हा परिषदेने शासनाकडे प्रस्ताव सादर करणे | दि. २६ नोव्हेंबर २०१० |
| ६ | राज्यस्तरीय समितीनें निकष पूर्ण करणाऱ्या ग्रामपंचायतींची अंतीम यादी जाहीर करणे | दि. १५ डिसेंबर २०१० पर्यंत |

### अ) पंचायत समिती स्तरीय तपासणी

पंचायत समिती स्तरावर तपासणी करतांना खालील मुद्दे विचारात घ्यावेत.

१. **वृक्षलागवड -** प्रथम वृक्ष लागवड नोंदवहीची (रजिस्टर) तपासणी करावी. त्यानंतर ग्रामपंचायतींना नकाशातील वृक्षांचे तपासणी करून त्याप्रमाणे प्रत्यक्षात वृक्ष लागवड झालेली खात्री करावी.

२. **शौचालय तपासणी -** ग्रामपंचायतीच्या शौचालय नोंदवहीची (रजिस्टर) तपासणी करावी. यात सर्व वैयक्तिक शौचालयाची नोंद असणे आवश्यक आहे. त्यानुसार गावातील एकूण कुटुंबे व गावात असलेली वैयक्तिक शौचालये तसेच सार्वजनिक शौचालय वापर करीत असणारी कुटुंबे या वरून शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटूंबांची टक्केवारी काढणे. प्रत्यक्षात गावातील वैयक्तिक शौचालयाची पाहणी करणे.

३. **करवसुली -** करवसुली संदर्भातील नोंदवहीची तपासणे. त्यात मागील वर्षातील कराची मागणी व प्रत्यक्षात कराची वसुली या वरून करवसुलीचे प्रमाण ६० टक्केपेक्षा अधिक असल्याचे खात्री करावी. तसेच नजीकची फेरआकारणी केली असल्याबाबत तपासणी करणे.

४. **ग्रामपंचायत व ग्रामसभा ठराव -** प्लॅस्टिक बंदी व विविध उत्सवातील मुर्तीचे विसर्जन करताना पर्यावरण प्रदुषणाच्या दृष्टीने उपाययोजना करण्याचा ठराव ग्रामपंचायतीने ग्रामसभेत केला

असल्याचे तपासणे. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानात व यशवंत पंचायत राज अभियानात भाग घेणेची हमी देणारा ठराव केला असल्याचे तपासणे. पंचायत समिती स्तरावरील उप समितीने वरील निकषांची १०० टक्के तपासणी करावी.

**तपासणीची पध्दती**

पंचायत समिती स्तरावर जिल्हा परिषद गटनिहाय उप समित्यांची स्थापना करावी. एका गटातील उपसमिती ही दुसऱ्या गटातील ग्रामपंचायतींची तपासणी करेल. मात्र दोन उप समित्या एकमेकांची तपासणी करणार नाही. (उदा. अ, ब व क हे तीन गट असल्यास अ गटाने ब ची, ब ने क ची व क ने अ ची तपासणी करावी मात्र अ ला ब ची व ब ला अ ची तपासणी करता येणार नाही.) तपासणी करताना पंचायत समिती स्तरावरील उपसमितींने त्यांच्याकडे सोपविलेल्या सर्व ग्रामपंचायतीने निकषानुसार १०० टक्के तपासणी करावी. तपासणी केल्या नंतर अहवाल पंचायत समितीकडे सादर करावा. पंचायत समितीस्तरीय तपासणी व सनियंत्रण समितीने उप समित्यांकडून आलेल्या अहवालाची रॅण्डम तपासणी करावयाचे असल्यास तशी तपासणी पंचायत समितीचे सभापती, उप सभापती व गट विकास अधिकारी यांनी करावी. दिनांक १८ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयानुसार पंचायत समिती स्तरावरील समितींने अहवालांची छाननी करून प्रस्ताव जिल्हा परिषदेकडे सादर करावेत.

**पंचायत समिती स्तरावरील जिल्हा परिषद गटनिहाय उपसमितीची रचना**

१. जिल्हा परिषद गटातील सदस्य - अध्यक्ष
२. संबंधीत पंचायत समिती गटातील २ सदस्य
३. उप अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा)/उप अभियंता (बांधकाम/छोपावि)/ गट शिक्षणाधिकारी / बाल विकास प्रकल्प अधिकारी /तालुका आरोग्य अधिकारी.
४. विस्तार अधिकारी (पंचायत) / कृषि अधिकारी / मुख्यसेविका (हे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील).
५. सभापती व गट विकास अधिकारी हे गटातील कोणतेही २ सरपंच निवडतील (त्यापैकी १ महिला राहील.)

**ब) जिल्हास्तरीय तपासणी**

जिल्हा स्तरीय तपासणी व सनियंत्रण समितीने तालुकास्तरीय समितीने शिफारस केलेल्या ग्रामपंचायतीच्या प्रकरणाची छाननी करावी. छाननीअंती पात्र प्रस्तावापैकी २०% ग्रामपंचायतीची रॅण्डम तपासणी जिल्हा परिषद स्तरावरुन करण्यात यावी. यासाठी जिल्हास्तरीय समितीने खालीलप्रमाणे प्रत्येकी तीन सदस्यांची एक उपसमिती याप्रमाणे आवश्यक तेवढया उप समित्या स्थापन करुन रॅण्डम तपासणी करावी.

**जिल्हा परिषद स्तरावरील उपसमितींची रचना**

१. जिल्हा परिषद, अध्यक्ष / उपाध्यक्ष / विषय समितीचे सभापती - (यापैकी एक प्रत्येक उप समितीत)

२. मुख्य कार्यकारी अधिकारी / अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं) / कार्यकारी अभियंता (पाणी पुरवठा) / कार्यकारी अभियंता (बांधकाम/छोपावि) / उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.वि.) / उप मुख्य कार्यकारी अधिकारी (म.बा.क.) / इतर खातेप्रमुख. (यापैकी एक प्रत्येक उप समितीत)

३. स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी. (प्रत्येक उप समितीत एक - मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी निवडलेली)

ज्या तालुक्याची तपासणी होणार आहे त्या तालुक्याचे पदाधिकारी व संस्था या उप समितीत असू नये. जिल्हा परिषद स्तरावरील उपसमितींने **निकषांची रॅण्डम पध्दतीने लॉट काढून** तपासणी करावी. तपासणी केल्या नंतर अहवाल जिल्हा परिषदेकडे सादर करावा. दिनांक १८ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयानुसार जिल्हा स्तरावरील समितींने अहवालांची छाननी करून प्रस्ताव शासनाकडे सादर करावेत.

तालुकास्तरीय उप समितीने तालुकास्तरावर उपलब्ध असलेल्या प्रामुख्याने समितीतील सदस्यांचे वाहन वापरण्यात यावे तसेच पंचायत समिती पातळीवरील सभापती /गट विकास अधिकारी यांचे वाहन या उप समितीस उपलब्ध करुन दयावे. जर वाहनाची उपलब्धता तालुक्यात नसल्यास जिल्हा परिषद अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हास्तरावरील वाहन उपलब्ध करुन दयावे. तपासणी करण्यासाठी मार्ग ठरवितांना एका मार्गावरची गावे घ्यावीत जेणे करुन कमीत कमी किलो मीटरने प्रवास होईल.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्यांचा संगणकीय संकेतांक **२०१००९२८१५५७३६००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**(डॉ. मल्लिनाथ कलशेट्टी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. माननीय राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५. मा. विधान सभा व विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्य सचिव
७. मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. विधी मंडळ ग्रंथालय, विधान भवन मुंबई (१० प्रती)
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीसाठी)
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. संचालक, राज्य ग्रामीण विकास यंत्रणा (यशदा), पुणे
१४. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र .पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, संयुक्त प्रशिक्षण केंद्र
१५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
१६. महालेखापाल, महाराष्ट्र -१ नागपूर (लेखा व परिक्षा अनुज्ञेयता)
१७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१८. ग्राम विकास विभागातील सर्व उप सचिव
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
२१. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई
२२. ग्रामविकास विभागातील सर्व कार्यासने व रोखशाखा
२३. निवडनस्ती, कार्यासन, पं. रा.-४(२२), ग्राम विकास व जलसंधारण विभाग

# पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना
## योजनेत निवड होणेसाठी ग्रामपंचायतचा अर्ज

१) ग्रामपंचायतीचे नाव : **(सेन्सस कोड क्र. )**

२) तालुका : जिल्हा :

(अ) ग्रामपंचायत स्थापना वर्ष

(ब) एकूण वॉर्ड

(क) एकूण सदस्य संख्या

३) लोकसंख्या (सन २००१ च्या जनगणनेनुसार) :

४) कुटुंब संख्या :

| अनु. जाती | अनु. जमाती | इतर | एकूण |
|---|---|---|---|
| | | | |

५) दारिद्रय रेषेखालील कुटुंबांची संख्या :

| अनु. जाती | अनु. जमाती | इतर | एकूण |
|---|---|---|---|
| | | | |

६) ग्रामपंचायत हद्दीत **१२ मार्च ते २ ऑक्टोबर, २०१० पर्यंत** लावलेल्या वृक्षांची संख्या,

| लोकसंख्या | लावण्यात आलेले वृक्ष | टक्केवारी | वृक्षलागवड रजिस्टर ठेवले आहे काय ? | वृक्षलागवडीचा हात नकाशा केला आहे काय ? |
|---|---|---|---|---|
| | | | होय / नाही | होय / नाही |

७) (अ) ग्रामपंचायतीने क्षेत्रफळावर आधारित घरपट्टी कर आकारणी केल्याचे वर्ष

(ब) करवसूली (२ ऑक्टोबर २०१०अखेर)

| घरपट्टी (२००९-१०) थकबाकीसह | | | पाणीपट्टी (२००९-१०) थकबाकीसह | | |
|---|---|---|---|---|---|
| मागणी | वसूली | टक्केवारी | मागणी | वसूली | टक्केवारी |
| | | | | | |

८. (अ) शौचालय असलेल्या कुटुंबांची संख्या :

| कुटुंबांची संख्या | वैयक्तिक शौचालये असलेल्या कुटुंबाची संख्या | टक्के | वैयक्तिक शौचालय नसलेले | सार्वजनिक शौचालय असल्यास शीटची संख्या | वापर करणा-या कुटुंबांची संख्या | शौचालय रजिस्टरमध्ये सर्व शौचालय धारकांची अद्यावत नोंदी आहेत का? | निर्मल ग्राम मिळाले असल्यास कोणत्यावर्षी मिळाले |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |

९. प्लॅस्टिक बंदी (५० मायक्रॉन) करण्याबाबतचा ग्रामपंचायत / ग्रामसभा ठराव.

ग्रामपंचायत ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

ग्राम सभा ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

१०. (अ) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानात सन २०१०-११ मध्ये भाग घेतला असल्याबाबतचा ग्रामपंचायतीचा व ग्रामसभेचा ठराव व दिनांक .

ग्रामपंचायत ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

ग्राम सभा ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

(ब) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानात सन २००९-१० मध्ये जिल्हापरिषद मतदारसंघनिहाय मुल्यमापनात मिळालेले गुण (१०० पैकी) ☐☐☐

(क) कोणत्याही स्तरावर बक्षिस जाहीर झाले असल्यास नमूद करावे.

११. (अ) यशवंत पंचायत राज अभियानात सन २०१०-११ मध्ये भाग घेतला असल्याबाबतचा ग्रामपंचायतीचा व ग्रामसभेचा ठराव

ग्रामपंचायत ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

ग्राम सभा ठराव क्रमांक ----------- दिनांक / /

(ब) यशवंत पंचायत राज अभियानात सन २००९-१० मध्ये जिल्हापरिषद मतदारसंघनिहाय मुल्यमापनात मिळालेले गुण (१०० पैकी) ☐☐☐

१२. ग्रामपंचायतीचे एकूण ☐☐☐

(अ) वार्षिक स्व:उत्पन्न ---------------------------------------

(ब) खर्च ---------------------------------------

१३. दिनांक २ ऑक्टोबर, २०१० च्या ग्रामसभेस उपस्थित असलेल्या ग्रामस्थांची संख्या

(अ) स्त्रिया संख्या

(ब) पुरुष संख्या

(क) हजर ग्रामपंचायत सदस्यांची संख्या

आमची ग्रामपंचायत ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या दिनांक १८ ऑगस्ट,२०१० च्या शासननिर्णयानुसार पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेत सहभाग होणेसाठी तसेच पहिल्या वर्षाचे अनुदान मिळवणेसाठी निश्चित केलेले निकष पूर्ण केले आहे. हे निकष पूर्ण केल्याची आम्ही तपासणी करून खात्री केली आहे. वृक्ष लागवड व वृक्ष संवर्धन रजिस्टर, शौचालय रजिस्टर, ग्रामपंचायत कर आकारणी रजिस्टर पूर्ण असून तालुका व जिल्हा, राज्य स्तरावरील कमिटीस तपासणी वेळेस उपलब्ध करण्यात येईल.

आमच्या ग्रामपंचायतीची निवड पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेत करून पहिल्या वर्षाचा निधी उपलब्ध करून देण्यास विनंती आहे.

सही/- सही/- सही/-

नांव: ------------------------, नांव: ------------------------, नांव: ------------------------, ग्रामसेवक /ग्राम विकास अधिकारी उपसरपंच ग्राम पंचायत ------- सरपंच ग्राम पंचायत -------

---

## पंचायत समिती शिफारस

---------------- ग्रामपंचायत, ---------------- तालुका ----------------, जिल्हा या ग्राम पंचायतीची तपासणी तालुका स्तरीय कमिटीकडून केली असून ही ग्रामपंचायत पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेचे निकष पूर्ण करीत असून या योजनेत या गावाची निवड करण्यासाठी व पहिल्या वर्षाचे अनुदान वितरीत करणेसाठी तालुकास्तरीय समिती, पंचायत समिती ----------------, जिल्हा ----------------, जिल्हास्तरीय समितीकडे शिफारस करीत आहे.

| | | |
|---|---|---|
| सही/- | सही/- | सही/- |
| नांव: ------------------------, | नांव: ------------------------, | नांव: ------------------------, |
| गट विकास अधिकारी, | उपसभापती, पं.स. | सभापती, |
| पं.स. ---------------- | पं.स. ---------------- | पं.स. ---------------- |